**महाराष्ट्र शासन**

क्रमांक:सीबीसी १०/२००१/प्र.क्र.१२०/मावक५
सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य,क्रीडा व
विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ८ फेब्रुवारी,२००४

वाचा:- शासन निर्णय, सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य,क्रीडा व विशेष सहाय्य विभाग
क्र.सीबीसी १०/२००१/प्र.क्र.१२०/मावक-५ दिनांक १ नोव्हेंबर,२००१

## आदेश

सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य,क्रीडा व विशेष सहाय्य विभागाच्या शासन निर्णय क्र.सीबीसी १०/२००१/प्र.क्र.१२०/मावक-५ दिनांक १ नोव्हेंबर,२००१ सोबतच्या परिशिष्ट "अ" येथील नियम २३(४) मधील तरतुदीनुसार अर्जदार महाराष्ट्र राज्याच्या सर्वसाधारण रहिवाशी असेल आणि तो अनुसूचित जातीपैकी असल्यास १० ऑगस्ट, १९५० या तारखेस, विमुक्त जाती, भटक्या जमातीपैकी असल्यास दिनांक २१.११.१९६१, इतर मागासवर्गीयाच्या असल्यास, दिनांक १३.१०.१९६७ व विशेष मागास प्रवर्गाचा असल्यास दिनांक १३.६.१९९५ या तारखेस तसेच वरील प्रवर्गात ज्या जाती नव्याने समाविष्ठ करण्यात आल्या असतील त्या तारखेस संबंधित अर्जदाराचे किंवा अर्जदाराचा जन्म या तारखेनंतर झाला असल्यास त्याच्या वडिलांचे कायम वास्तव्य व जातीबाबतचा उल्लेख असलेली वरील तारखांपर्यन्तची कागदपत्रे जातीची प्रमाणपत्रे देणा-या सक्षम प्राधिका-याकडे अर्जदाराने देणे आवश्यक आहे.

२. जातीचे प्रमाणपत्र मिळविण्यासाठी अर्जदारानी वास्तव्याबाबत व जातीच्या पुरावे सक्षम प्राधिका-याकडे सादर करावेत असे वरीलप्रमाणे स्पष्ट आदेश असतानाही जातीची प्रमाणपत्र देणारे सक्षम अधिकारी हे अनुसूचित जाती, विमुक्त जाती व भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गाचे प्रमाणपत्र प्राप्त करण्यासाठी अर्ज करणा-या व्यक्तीकडे वरील तारखांपूर्वीचे वास्तव्याचे व जातीबाबतचे पुरावे मागतात अशा अनेक तक्रारी शासनाकडे प्राप्त झाल्या आहेत. त्याबाबत शासन असे स्पष्ट करीत आहे की, या विभागाचा शासन निर्णय, दिनांक १-११-२००१ मधील सोबतच्या परिशिष्ट "अ" येथील नियम क्रमांक २३(४) येथील अट व नियम आजही कायम आहे. त्यामुळे अनुसूचित जाती, विमुक्त जाती व भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गाच्या यादीमध्ये ज्या शासकीय आदेशाच्या दिनांकाचा किंवा त्या याघांमध्ये वेळोवेळी केलेल्या सुधारणाच्या दिनांकांपर्यन्तचा अर्जदारांकडून त्याच्या जातीचा पुरावा तसेच वास्तव्याचा पुरावा मागवा. त्या तारखापूर्वीचे वास्तव्याचे व जातीबाबतचे पुरावे सक्षम प्राधिका-यानी मागू नयेत. उदा. अनुसूचित जातीच्या अर्जदारांकडून दिनांक १०.८.१९५० पर्यन्तचा

वास्तव्याचा व जातीचा पुरावा मागणे आवश्यक असतानाही मुद्दामहून सन १९४०, १९४२, १९४५ इत्यादी सालाचे जुने पुरावे अर्जदारांकडून वरील कालावधीतील जुने पुरावे मागू नयेत.

३. मात्र अर्जदारांनी त्यांचा ज्या गावी किंवा शहरात जन्म झाला येथील वास्तव्याचा पुरावा शाळासंबंधीचे पुरावे जे आवश्यक आहेत ते जातीची प्रमाणपत्र देणा-या अधिका-यांकडे सादर करावेत व त्या कागदपत्राच्या आधारावर सक्षम प्राधिका-यानी निर्णय घ्यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( डॉ. मुन्शीलाल गौतम )**
**शासनाचे प्रधान सचिव**

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्याचे सचिव,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
मुख्य महानगर दंडाधिकारी,
सर्व विभागीय आयुक्त,
संचालक, समाजकल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग संचानालय, पुणे.
संचालक, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, आदिवासी कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
सर्व जिल्हा दंडाधिकारी
सर्व उप विभागीय अधिकारी ( महसूल )

**त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदर आदेश त्यांचे अद्यिपत्याखाली सर्व तहसिलदार यांच्या निदर्शनास आणून द्यावेत.**

सर्व उप जिल्हाधिकारी
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
**सर्व मंत्रालयीन विभाग**

**त्यांना विनंती करण्यांत येते की, त्यांनी सदर आदेश त्यांचे अद्यिपत्याखाली सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांचे निदर्शनास आणून द्यावेत.**

निवड नस्ती का -मावक -५